**राज्यातील पोलीस निवासी व कार्यालयीन इमारतींच्या संरचनात्मक दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.सीआरपी - ०५१६/प्र.क्र.३३७ / पोल-७,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०१७.

<u>वाचा</u> :- १. शासन निर्णय क्र.सीआरपी - ०५१६/प्र.क्र.३३७ / पोल-७, दि. ०८ सप्टेंबर, २०१६
२. शासन निर्णय क्र.सीआरपी - ०५१६/प्र.क्र.३३७ / पोल-७, दि. ०३ ऑक्टोबर, २०१६
३. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/ प्र.क्र.८९/ अर्थ-३, दि.०८.०२. २०१७.

**<u>शासन निर्णय:-</u>**

राज्यातील पोलीस निवासी व कार्यालयीन इमारतींची संरचनात्मक दुरुस्ती करण्यासाठी सन २०१६-१७ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रुपये ४५.००कोटी निधीपैकी रु.३६.००कोटी इतका निधी महाराष्ट्र पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकडे जमा करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सदर निधी प्रकल्पनिहाय वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच सन २०१६-१७ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये सदर प्रयोजनासाठी रु.७३.१४३१कोटी इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या निधीपैकी उर्वरित रु.०९.०० कोटी अधिक हिवाळी अधिवेशनामध्ये मंजूर रु.७३.१४३१ असे एकुण रु.८२,१४,३१,०००/-(रुपये ब्याऐंशी कोटी चौदा लक्ष एकतीस हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकडे खालील अटींच्या अधीन राहून जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकडे जमा केलेल्या निधीचा स्वतंत्रपणे लेखा (Account) तयार करावा.

२) पोलीस विभागाच्या निवासी व कार्यालयीन इमारतींच्या दुरुस्तीसाठी संबंधित पोलीस घटकप्रमुखांमार्फत प्रत्यक्ष काम करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करुन देण्यात यावा. या सर्व कामावरती पोलीस गृहनिर्माण महामंडळाचे नियंत्रण व मार्गदर्शन राहील.

३) शासनाच्या मान्यतेशिवाय कोणत्याही प्रकारच्या दुरुस्तीच्या कामांसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येऊ नये.

४) सदर कामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत विहित वेळेत करण्यात यावीत.

५) प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामांना प्रत्यक्ष निधी उपलब्ध झाल्याशिवाय ती सुरु करण्यात येऊ नयेत.

६) पोलीस विभागाच्या इमारतींची दुरुस्तीची कामे केल्यानंतर दुरुस्ती केलेल्या इमारतींच्या आयुर्मानात निश्चीत वाढ होईल व त्या दीर्घकाळ वापरात येतील याची खात्री करण्यात यावी.

७) प्रस्तावास सक्षम प्राधीकाऱ्याची तांत्रिक मान्यता घ्यावी.

८) पोलीस घटक प्रमुखांनी या कामांची आवश्यकता, प्रत्यक्ष निधीची उपलब्धता, गुणवत्ता, प्रगती इ. बाबत आवश्यकतेप्रमाणे सर्वसाधारण आढावा नियमितपणे घ्यावा.

९) या कामांसाठी खर्च करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी पोलीस गृहनिर्माण महामंडळास व शासनास सादर करण्यात यावे.

२. राज्यातील पोलीस इमारतींच्या दुरुस्तीच्या कामांसाठी "मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस (००) १०९, जिल्हा पोलीस (००)(००)(०१) जिल्हा पोलीस बल (दत्तमत) (२०५५ ०१६८) २७, लहान बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत पूरवणी मागणीद्वारे मंजूर रु.८२,१४,३१,०००/-(रुपये ब्याऐंशी कोटी चौदा लक्ष एकतीस हजार फक्त) इतका निधी आहरीत करुन पोलीस गृहनिर्माण महामंडळाकडे जमा करण्यासाठी अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून काढून ती पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळास अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दिनांक ०८.०२.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.oom या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, संगणक सांकेताक २०१७०२१८१७३५१२३६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.02.18 17:43:17 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या, वरळी, मुंबई.
३. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. वित्त विभाग, (व्यय-७,/ अर्थ-११/ अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
८. गृह विभाग, (बीयुडी-१/ बीयुडी-२) मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-७).